मॅट्रिकोत्तर शिष्यवृत्ती व शिक्षण फी/ परिक्षा फीची २०१३-१४ अखेर पर्यंतची प्रलंबित प्रकरणे तात्काळ निकाली काढण्याबाबत

**महाराष्ट्र शासन**

**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः इबीसी २०१४/प्र.क्र.९७/शिक्षण-१**

मंत्रालय विस्तार भवन, मुंबई - ४०० ०३२

तारीख: ०१ ऑगस्ट,२०१४

**मा.मंत्रीमंडळाच्या दि.३१.०७.२०१४ रोजीच्या बैठकीत मागील प्रलंबित मॅट्रिकोत्तर शिष्यवृत्ती व शिक्षण फी/ परिक्षा फी बाबत उपस्थित झालेल्या मुद्याच्या अनुषंगाने मा.मंत्री (सामाजिक न्याय), मा.मंत्री (ग्रामविकास), मा. मंत्री (वैद्यकिय शिक्षण) तसेच अपर मुख्य सचिव (नियोजन विभाग), प्रधान सचिव (वित्त विभाग) व सचिव (सामाजिक न्याय) यांच्या समवेत सविस्तर चर्चा झाली. सदर चर्चेत सर्व प्रवर्गांच्या प्रलंबित प्रकरणांकरीता पुरेशी तरतूद चालू आर्थिक वर्षात करण्यात आली असून त्यापैकी आवश्यक तेवढी तरतूद बीम्सवर वितरीतदेखील करण्यात आली आहे. तथापि सदर रक्कम अद्यापही खर्च झाली नसल्याचे निदर्शनास आले. ही बाब विचारात घेऊन मागील सर्व प्रलंबित प्रकरणे निकाली काढण्याच्या अनुषंगाने तातडीने कार्यवाहीकरीता पुढीलप्रमाणे निर्देश देण्यात येत आहेत -**

१) अजा, विजाभज, विमाप्र व इमाव प्रवर्गातील विद्यार्थ्यांना मॅट्रिकोत्तर शिष्यवृत्ती व शिक्षण फी/ परिक्षा फीची सन २०१३-१४ अखेर पर्यंतची सर्व प्रलंबित प्रकरणे दि.१३.०८.२०१४ पर्यंत निकाली काढण्याची विशेष मोहिम घेऊन विनाविलंब कार्यवाही करावी. त्याप्रमाणे सर्व सहाय्यक आयुक्त, समाजकल्याण यांनी प्रादेशिक उपायुक्तांमार्फत तसा अहवाल आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, पुणे व संचालक, विजाभज, विमाप्र व इमाव संचालनालय, पुणे यांना सादर करावा. त्याबाबतचा एकत्रित अहवाल आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, पुणे व संचालक, विजाभज, विमाप्र व इमाव संचालनालय, पुणे यांनी दि.१४.०८.२०१४ रोजी उपरोक्त विशेष मोहिमेबाबतचा अहवाल शासनास सादर करावा.

२) मॅट्रिकोत्तर शिष्यवृत्ती व शिक्षण फी/ परिक्षा फीची जुन्या प्रलंबित प्रकरणांबाबत कोषागाराकडून आक्षेप घेतले जात असल्याने ज्या प्रकरणांमध्ये शासन मान्यतेची आवश्यकता आहे अशी प्रकरणे येत्या ०३

दिवसात जिल्हा स्तरावरुन आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, पुणे व संचालक, विजाभज, विमाप्र व इमाव संचालनालय, पुणे यांच्याकडे सादर करुन त्यानंतरच्या २ दिवसात ती प्रकरणे शासन मान्यतेसाठी सादर होतील हे पहावे.

3) अजा, विजाभज, विमाप्र व इमाव प्रवर्गातील विद्यार्थ्यांना मॅट्रिकोत्तर शिष्यवृत्ती व शिक्षण फी/ परिक्षा फी योजनेंतर्गत ज्या अभ्यासक्रमांना संबंधित प्रवर्गाकरिता शिष्यवृत्ती, शिक्षण फी/ परिक्षा फी देय नाही, अशी प्रकरणे प्रलंबित प्रकरणांमध्ये असल्यास ती प्रकरणे प्रलंबितमधून बाजूला ठेवण्याची देखील कार्यवाही करावी. जेणेकरुन प्रत्यक्षात प्रलंबित असलेल्या प्रकरणांबाबत जलद गतीने कार्यवाही करणे शक्य होईल.

२. वरीलप्रमाणे विशेष मोहिमेद्वारे सर्व जिल्हयातील प्रलंबित प्रकरणे "निरंक" होणे अपेक्षित असल्याने दि.१३.०८.२०१४ अखेर ज्या जिल्हयातील प्रकरणे प्रलंबित राहतील त्याबाबत संबंधित सहाय्यक आयुक्त, समाजकल्याण यांना व्यक्तीशः जबाबदार धरण्यात येईल, याची जाणीव सर्व संबंधीत अधिकाऱ्यांना करुन द्यावी.

सदर शासन पत्र महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक२०१४०८०११७११०८६८२२असा आहे. हे पत्र डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

Uttam Shivaram Lonare

Digitally signed by Uttam Shivaram Lonare
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Social Justice &Spl Assistance, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Uttam Shivaram Lonare
Date: 2014.08.01 17:21:53 +05'30'

(उ. शि. लोणारे)

उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

सर्व प्रादेशिक उपायुक्त, समाज कल्याण विभाग

सर्व सहाय्यक आयुक्त, समाजकल्याण

Regarding dispose of pending Postmatric & Freeship cases